नवीन लेखाशिर्ष उघडणेबाबत

**आदिवासी उपयोजना क्षेत्रातर्गंत वृक्ष लागवड आणि संगोपन (राज्यस्तर) योजना**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. वृक्षसं २०१८/प्र.क्र.९७/ का. १४**
मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई ३२
**दिनांक : १५/०२/२०१९**

**वाचा:- महसूल व वन विभागाचा शासन निर्णय क्र. सावावि-२०१८/प्र.क्र.१४४/फ-११, दि.०६/०९/२०१८**

**प्रस्तावना :-**

वन विभागास वृक्ष लागवडीच्या मर्यादा असल्यामुळे वनीकरणाचा भरीव कार्यक्रम वनेत्तर क्षेत्रात घेण्याशिवाय पर्याय नाही. कारण वनक्षेत्र हे मर्यादित असून त्यामध्ये वाढ होण्यास वाव नाही. या बाबी विचारात घेऊन, वनेत्तर क्षेत्रावर वृक्ष लागवडीचा व्यापक कार्यक्रम हाती घेण्याचा निर्धार आहे. त्यासाठी राज्य शासनाचे सर्व प्रशासकीय विभाग, केंद्र शासनाकडील रेल्वे, राष्ट्रिय महामार्ग आणि संरक्षण विभागाच्या व इतर केंद्रीय आस्थापनांच्या जागांवर देखील वृक्ष लागवड करण्याचा समावेश आहे. या सर्व यंत्रणांना ठराविक उद्दिष्ट देऊन त्यांच्यामार्फत वृक्ष लागवड कार्यक्रम राबविण्यात येणार आहे. त्यासाठी प्रशासकीय विभागांना निधीची आवश्यकता भासणार आहे. उक्त कार्यक्रमांतर्गत ज्या विभागाकडे स्वत:ची मोकळी जागा आहे, अशा प्रशासकीय विभागानी "वृक्ष लागवड व संगोपनासाठी" यासाठी नवीन लेखाशिर्ष घेवून, त्यांअंतर्गत त्यांचेकडील एकंदर अर्थसंकल्पिय तरतूदींपैकी "कार्यक्रमावरील खर्चामधून" (पुर्वीची योजनांतर्गत तरतूद) ०.५ टक्केच्या मर्यादेत तरतूद उपलब्ध करून घेण्यास महसूल व वन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने आदिवासी विकास विभागाच्या सर्व क्षेत्रीय कार्यालयामध्ये (सर्व आदिवासी आश्रमशाळा व वसतीगृहांसहीत) " वृक्ष लागवड आणि संगोपन (राज्यस्तर)" या योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करून देण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी विकास विभागाच्या सर्व क्षेत्रीय कार्यालयामध्ये (सर्व आदिवासी आश्रमशाळा व वसतीगृहांसहीत) " वृक्ष लागवड आणि संगोपन (राज्यस्तर)" या योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करून देण्यासाठी खालील प्रमाणे नवीन लेखाशिर्ष उघडण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| मागणी क्रमांक/ Demand No. | मराठी | इंग्रजी |
|---|---|---|
| | टी-५ | T-५ |
| मुख्य लेखाशिर्ष/Major Head | २४०६-वनीकरण व वन्यजीवन | २४०६-Forestry and Wild Life |
| उप मुख्य लेखाशिर्ष/Sub Major Head | ०४, वनीकरण व पर्यावरण विकास | ०४, Afforestation and Ecology Development |
| गौणशिर्ष/Minor Head | ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना | ७९६, Tribal Area Sub Plan |
| गटशिर्ष/Group Head | (००) | (००) |
| उप गट शिर्ष/Sub Group Head | (००)(०१) शाश्वत विकास ध्येय (ध्येय १५- जमिनीवरील सजीव) अंतर्गत वृक्ष लागवड आणि संगोपन (राज्यस्तर योजना) | (००) (०१)Tree plantation and Conservation under Sustainable Development Goals (Goal १५- life on land) (State Level Scheme) |
| उद्दिष्टे/Objects | ०२-मजूरी | ०२-Wages |
| | १३-कार्यालयीन खर्च | १३-Office Expenses |
| | २१- पुरवठा व सामग्री | २१-Supplies and Materials |
| लेखाशिर्ष | २४०६ A३०९ | २४०६ A३०९ |

२. सदर शासन निर्णय मा. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ख.वि./चा-१/ आदिवासी विकास विभाग/युओआर-१३५/२०१८-१९/९७५ दिनांक ०३/१२/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५०४/व्यय-१४, दिनांक २९/११/२०१८ नुसार प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे सदर योजनेचे नियंत्रक अधिकारी असतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९०२१५१५१६५३४४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Mahadu Raut

Digitally signed by Pandurang Mahadu Raut
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=136cc102e03660c61e3577e800c6edb8125d21d6c9d7742a980d024e919fa85c, cn=Pandurang Mahadu Raut
Date: 2019.02.15 15:18:20 +05'30'

**( पांडुरंग म. राऊत)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई-३२
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्य मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर
७. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर
८. मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
९. मा.प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
११. सर्व अप्पर आयुक्त, आदिवासी विकास
१२. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय
१३. सर्व जिल्हाधिकारी, (आदिवासी उपयोजनेतर्गत येत असलेले जिल्हे)
१४. अधिदान व लेखाधिकारी , मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१८. कक्ष अधिकारी, का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
१९. निवड नस्ती (का.१४)